महाराष्ट्र राज्य सायबर, कार्यालयास (२०५५A०२३) या लेखाशीर्ष मधील ०६-दूरध्वनी, विदयुत आणि पाणी देयके, ११-प्रवास खर्च, १३- कार्यालयीन खर्च, १७-संगणक खर्च, या उद्दिष्ट निहाय निधीच्या वितरणास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-०२२५/प्र.क्र.४७/विशा-३(अ)**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख: १२ मार्च, २०२५

**संदर्भ :-**

विशेष पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य सायबर कार्यालय, मुंबई यांचे पत्र दि.३०.०१.२०२५, दि.०४,०२,२०२५ व दि.१०.०२.२०२५

**प्रस्तावना :-**

विशेष पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई येथील कार्यालयातील दूरध्वनी, विदयुत आणि पाणी देयके, प्रवास खर्च, कार्यालयीन खर्च, संगणक खर्च याबाबीसाठी निधी उपलब्ध करून देण्याबाबत उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये विशेष पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य सायबर कार्यालय, मुंबई यांनी शासनास विनंती केली होती. त्यानुसार सदर बाबीसाठी निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीत तरतूदीतून लेखाशीर्ष मागणी क्र.१, २०५५-पोलीस (००) (१०१) गुन्हे अन्वेषण व दक्षता (००) (०६) सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध (अनिवार्य) (२०५५A०२३) या लेखाशीर्षतंर्गत खालील उद्दिष्ट निहाय निधी अपर पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई यांना उपलब्ध करून देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | उद्दिष्ट | निधी |
|---|---|---|
| १ | ०६-दूरध्वनी, विदयुत आणि पाणी देयके | रू. १,२६,००० /- |
| २ | ११-प्रवास खर्च, | रू.३,००,०००/- |
| ३ | १३- कार्यालयीन खर्च | रू.२,००,०००/- |
| ४ | १७-संगणक खर्च | रू. ५,००,०००/- |

२. सदर निधी आहरित करण्यासाठी अपर पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई हे “नियंत्रण अधिकारी” तसेच त्यांच्या अधिनस्त कार्यालयाचे वरिष्ठ कार्यालय अधीक्षक/ प्रशासकीय अधिकारी महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई हे “आहरण व संवितरण अधिकारी” असतील.

३. उपरोक्त निधी खर्च करतांना वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/ प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४ नमूद करण्यात आलेल्या परिच्छेद ५ ते १९ मधील मार्गदर्शक सूचना व परिशिष्टामधील मार्गदर्शक सूचनाचे काटेकोर पालन करावे व वेळोवेळी विहीत विवरणपत्रात उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग/ व्यय-७ च्या अनौपचारीक संदर्भ क्र.१३१/२०२५ दि.२५.०२.२०२५ अन्वये वित्त विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१२११४६४९६१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SWAPNA NILESH DESHPANDE

Digitally signed by SWAPNA NILESH DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=8f33d110713d529fd14cadb7107a7a56252382926dfbbe68e0ce49aae150e1e8, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F68C2CBBE864D14D120F29960E8E60D5C00E2D614E6A0234A132D68EADBD05CC, cn=SWAPNA NILESH DESHPANDE
Date: 2025.03.12 11:47:31 +05'30'

**( स्वप्ना देशपांडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य सायबर,मुंबई.
२. सह/उप सचिव (कार्यासन बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३
३. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा),मुंबई /नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
६. निवडनस्ती /विशा-३(अ)